**सन २०१६-१७ या चालू वित्तीय वर्षासाठी मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण मागणी क्र. एक्स-१, या लेखाशीर्षाखाली पुनर्विनियोजन.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पूरक -२०१६/प्र.क्र.१८१/का-८,**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ मार्च, २०१७.

**संदर्भ-** १. शासन निर्णय क्रमांक : बालसं-२०१६/प्र.क्र.०६/का-८ दि. ७ जून, २०१६.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पूरक २०१६/प्र.क्र.२०१/अर्थ-३ दि. ४ जानेवारी, २०१७.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३ दि. ८ फेब्रुवारी, २०१७.

**प्रस्तावना -**

महिला व बाल विकास विभागाकडून अनाथ, निराधार, बेघर व अन्य प्रकारे आपत्तीत असलेले (Crisis) बालकांचे संस्थाबाह्य आणि कौंटुबिक वातावरणात संगोपन व्हावे, याद्दष्टीने बाल संगोपन योजना राबविण्यात येते. सन २०१६-१७ या चालू आर्थिक वर्षापासून बाल संगोपन योजनेसाठी उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ अन्वये नवीन लेखाशिर्ष व संगणक संकेतांक (२२३५ B९०६) हा प्राप्त करण्यात आलेला आहे.

२. सदर लेखाशिर्षांतर्गत रू. १०.०० कोटी इतका निधी मंजूर अनुदानातून भागविता येणे शक्य असल्याने एक हजार इतक्या रकमेची लाक्षणिक पुरवणी मागणी डिसेंबर, २०१६ मध्ये मान्य झालेली आहे. संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये डिसेंबर,२०१६ मध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी वितरित करण्यासाठीचा प्रस्ताव नियोजन व वित्त विभागास सादर करण्यात आला होता.

३. नवीन लेखाशिर्ष प्राप्त होण्यापूर्वी, बाल संगोपन योजनेचा खर्च हा लेखाशिर्ष (२२३५ ११४७) अंतर्गतच्या तरतूदीतून करण्यात येत होता. चालू आर्थिक वर्षामध्ये लेखाशिर्ष (२२३५ ११४७) अंतर्गत रू. २६.२१ कोटी इतका निधी अर्थसंकल्पित असून वित्त विभागाच्या संदर्भाधीन ३ च्या परिपत्रकाअन्वये योजनांतर्गत निधीच्या खर्चाची मर्यादा ८० टक्के इतकी करण्यात आलेली असल्याने वित्त विभागाने रू. २०.९७ कोटी इतक्या वितरित निधीच्या मर्यादेत खर्च करण्यास तसेच पुनर्विनियोजनाने नवीन योजनेसाठी निधी उपलब्ध केल्यावर अर्थसंकल्प नियम पुस्तिकेतील तरतूदीनुसार मूळ योजनेमध्ये अन्य मार्गाने निधी उपलब्ध करता येणार नाही आणि पुनर्विनियोजनाने उपलब्ध केलेला निधी दि. ३१.३.२०१७ पूर्वी खर्ची पडेल या अटींसह पुनर्विनियोजन प्रस्तावास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार आता खालीलप्रमाणे पुनर्विनियोजन करण्यात येत आहे.

(रू. हजारात)

| लेखाशिर्ष व उद्दिष्ट | कमी करण्यात येत असलेली रक्कम | लेखाशिर्ष व उद्दिष्ट | वाढ करण्यात आलेली रक्कम |
|---|---|---|---|
| २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण,<br>०२,समाज कल्याण,<br>१०२, बाल कल्याण,<br>०५-निराश्रित बालकांसाठी संस्थेतर सेवा,<br>(०५)(०२) निराश्रित बालकांसाठी संस्थेतर सेवा,<br>३१-सहाय्यक अनुदान वेतनेतर (२२३५-११४७),<br>मागणी क्र.एक्स -०१ | ८०००० | २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण,<br>०२,समाज कल्याण,<br>१०२, बाल कल्याण,<br>१५ बाल संगोपन योजना,<br>(१५)(०१) बाल संगोपन योजनेसाठी अनुदान ,<br>३१-सहाय्यक अनुदान वेतनेतर (२२३५-B९०६),<br>मागणी क्र.एक्स -०१ | ८०००० |

४. सदर निधी वितरणाकरिता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतूदींपेक्षा त्या-त्या शीर्षाखाली अधिकचा खर्च होणार नाही याची काळजी नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी. या रकमा खर्च करताना या विभागाच्या तसेच वित्त विभागाच्या वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे. अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये ज्यासाठी तरतूद करण्यात आलेली नाही किंवा अन्यथा जी विधानमंडळाकडून प्राधिकृत करण्यात आलेली नाही, अशा नवीन बाबींवरील खर्च भागविण्यासाठी विचाराधीन अनुदानाचे पुनर्विनियोजन करण्यात आलेले नाही.

६. सदर आदेश वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१९/१७ व्यय-६ दि. ०६.०.२.२०१७ व ९७/अर्थ-७/१७ दि.१८.२.२०१७ नुसार दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०३०६१५५९००६३३० असा आहे. सदरचा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

८. सोबतच्या विवरणपत्राप्रमाणे वरील पुनर्विनियोजनास मान्यता देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Surendra Pralhad Chankar

Digitally signed by Surendra Pralhad Chankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=da74ced4daa59e5121be348655e71412ea68827bae27cd8d480eb3963ff77726, serialNumber=f0abc250c4d9be2b6b786fa7056a78c0298ba36e78a4582723738fdd3d550d44, cn=Surendra Pralhad Chankar
Date: 2017.03.09 12:14:13 +05'30'

**( सुरेन्द्र प्र. चानकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा व अनुज्ञेयता )/(लेखा परीक्षा )मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
३. उपायुक्त(बालविकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास.
५. कक्ष अधिकारी (१४७२) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. कक्ष अधिकारी (अर्थ-७) व कक्ष अधिकारी (व्यय -६) वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी (कार्यासन-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती (कार्यासन-८).

## विवरणपत्र

**मुख्यलेखाशीर्ष- २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण मागणी क्रमांक :- एक्स-१ खालील सन २०१६-१७ मध्ये पुनर्विनियोजन केलेली रक्कम दर्शविणारा तक्ता शा.नि. महिला व बाल विकास विभाग,क्रमांक-पूरक -२०१६/प्र.क्र.१८१/का-८, दिनांक- ०७ मार्च २०१७. चे सहपत्र**

**(रू.हजारात)**

| लेखाशिर्ष व उद्दिष्ट | सन २०१६-१७ मध्ये अर्थसंकल्पित निधी | सन २०१६-१७ मध्ये वितरित निधी | कमी करण्यात येत असलेली रक्कम | पुनर्विनियोजना नंतर शिल्लक राहणारी एकूण रक्कम | लेखाशिर्ष व उद्दिष्ट | सन २०१६-१७ मध्ये अर्थसंकल्पित निधी | वाढ करण्यात आलेली रक्कम | पुनर्विनियोजना नंतर उपलब्ध एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२,समाज कल्याण, १०२, बाल कल्याण ०५-निराश्रित बालकांसाठी संस्थेतर सेवा (२२३५-११४७), ३१-सहाय्यक अनुदान वेतनेतर मागणी क्र. एक्स -०१ | २६२१२३ | २०९६९८ | ८०००० | १२९६९८ | २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२,समाज कल्याण, १०२, बाल कल्याण १५ बाल संगोपन योजना (१५)(०१) बाल संगोपन योजनेसाठी अनुदान ३१-सहाय्यक अनुदान वेतनेतर (२२३५-B९०६), मागणी क्र.एक्स -०१ | १ | ८०००० | ८०००१ |